


ई-साहित्य प्रकाशन

दिनांक ११ जून २०१०

वर्ष दुसरे
अंक १८





: **संपादक** :

भारती सरमळकर (मुंबई)

: **सह संपादक** :

सोनाली घाटपांडे (पुणे), स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)

# --- संपादकीय ---

Good things come in small packages.......... हो नं खरयं अगदी.... आयुष्यातील अविस्मरणीय स्वर्गीय आनंद ह्या छोटया छोटया क्षणांमध्येच लपलेला असतो. अगदी तसाच जसा नेटाक्षरीच्या ह्या अंकात छोटया छोटया कविता लपल्या आहेत.... थोडक्यातच खुप काही सांगता येतं, बोलता येतं आणि लिहिता सुध्दा येतं... नेटाक्षरीचा हा अंक अश्याच छोटया परंतु गहन गाभा असणा-या अर्थपुर्ण लघुकवितांना समर्पित केला आहे.

ह्या अंकातील सर्व लघुकविता ह्या त्रिवेणी, चारोळी किंवा पाचोळी ह्या काव्य प्रकारात बसत नाहीत..... ह्या आहेत मोजक्या शब्दातील संपुर्ण कविता ज्यातून आमच्या कवी, कवयित्रीनी त्यांच्या भावना, त्यांचे विचार अगदी सुंदर आणि चोख मांडले आहेत.... पान पान भरुनही आपली भावना व्यक्त करता येते आणि शांत राहूनही.... पण कधी कुणी ह्यामधला सुवर्णमध्य साधलाय का? अगदी मोजक्या शब्दात अचूकपणे आपली भावना, आपला विचार वाचकांपर्यंत पोहोचवलाय का कुणी ? हो आजच्या नेटाक्षरीच्या अंकातील ह्या सर्व कवी कवयित्रीनी.. ह्या अंकातील सर्वात मोठ्या कविता दोन आहेत आणि त्याही फक्त ४८ शब्दांच्या (Designer Poem आणि पुत्रवियोग) आणि सर्वात छोटी कविता आहे.... हम्म्म्म काही अंदाज बांधता येतोय का? नाही नं .... सर्वात छोटी कविता आहे फक्त १३ शब्दांची (कर्ण)...... झालात नं अचंबित.... उत्सुकता शिगेला पोहचली नं.....चला तर मी ही जास्त शब्दांची जत्रा न भरवता नेटाक्षरीचा हा छोटया छोटया लघुकवितांचा छोटेखानी अंक आमच्या सर्व रसिक वाचंकांना सादर करते. आशा करते नेहमीप्रमाणेच हा अंक सर्वांना आवडेल...........

**भारती सरमळकर**

संपादक - मुंबई

# ...... ताकद ......

तुझ्या डोळ्यात
कायम निद्रिस्त ज्वालामुखी
तर माझे डोळे म्हणजे
खवळलेला समुद्र
ज्वालामुखीत भस्मसात करण्याची ताकद असेल
तर समुद्रही आहे तसाच
सर्वसमावेशक
म्हणून सांगते;
उगाच भलत्या भरीला पडू नको
आणि पाडू ही नको
प्रत्येकाने आपापली ताकद जपावी



..... आसावरी गुपचुप

# ...... देन ......

झिंगलेल्या रातीकडून
झिंगलेपणाचं देन घेऊन
पडून रहावं शांतपणानं

घेऊ नये मुळी अंधाराचा ठाव
अन करुही नये प्रकाशाची हाव

अनुभवत कैफ
असुनही नसण्यातला
विसरुन जावं देहभान
पुसत अस्तित्वाच्या खुणा



..... अनिल बिहाणी

# ...... नयनी अश्रू सामावले ......

नयनी अश्रू सामावले
तरी पुढेपुढे चालले....
कळ उठे जिवाशी
मन गुंते मोहजाळी
नकोनको सांगे जरी
परी येई फिरुनी...
नको आशा लावू
अंत जवळी आला
मागेमागे धावे मन
नाही पाझर उरला...
आशा एका दिपाची
सांगे लावीन वात
पुन्हा सूर्य उजळीन
शतशत देईन प्रकाश...



..... सोनाली घाटपांडे

# ...... अज्ञेय ......

तुझ्या देहात नसणारे
पण डोळ्यातून अवचित दिसणारे
ते गूढ फोर्थ dimension
नकळत ओढ लावतो जगण्याची
उत्सुकता जिथे संपावी
तिथुन पाउलवाट सुरु होते
तुझ्या अज्ञेय कासावीस नजरेची
काही कळण्याच्या आत
लवते तुझी मायाधीन पापणी
मग पुन्हा नाईलाजाने
जुन्या मार्गानेच अध्यात्म शोधतो



..... शशांक प्रतापवार

# …… Designer Poem ……

हा..
माणुस..
एक अपरिचित शब्द..
प्रत्यक्षात पाहिला मात्र नाही कधी.
पाहिल्या आहेत फक्त त्याच्या जुजबी प्रतिकृती..
भविष्यकाळातले काही प्रोटो-टाईप्स.
असंख्य त्रुटींनी भरलेले..
तकलादू.
का?
कारण..
निसर्गतः..
२ माकडाच्या संयोगाने..
वाढत रहाणार फक्त वानरांचीच पैदास.
सहस्त्रावधी वर्षांनी उत्क्रांतीचे सागर ओलांडून..
अवतरेलही कदाचित खराखुरा मानव..
दाखवलीय ज्याने झलक..
क्वचितच..
कधी.



….. अहं ब्रह्मास्मी

# ...... पुत्रवियोग ......

पिंपळाच्या पानाला
स्वतःच्या खांद्यावर घेऊन
सैरभैर वाहणारा वारा,
त्याचे लाड पुरवत, त्याला जपत,
जमिनीचा स्पर्शदेखील न होवू देता
घेवून जात होता अलगद, हळूवार,
उंच आणि उंच आणि उंच....

तेव्हा सतराव्या मजल्यावरल्या ‘त्या’
खुळ्या हातांनी पानाला धरलं चिमटीत,
आणि बंद केलं
पुस्तकाच्या दोन पानांत.........
तेव्हा वारा वहायचा थांबला.............
कायमचा



..... शंतनू चंद्रात्रे

# …… उशीरा ……

जिथे तू सोडून गेलीस
अजुनही मी तिथेच आहे
भोवताली माझ्या मी
वांझोट वर्तुळ मांडलं आहे

सांगू तरी कशाला
वर्तुळातच
आवाज किती घुमले माझे
उशीरा हाक ऐकू आली तुला
पण आता
नेहमी मरण्याचीच सवय मोडली आहे !!



….. डॉ. ऑशियनहिल

# ...... सावली ......

माफ कर मजला
मी साथ नाही देवू शकले
काट्याच्या वाटेवरती
फूल नाही होवू शकले..
गंध ही नाही जाहले
जो दरवळी भवताल
रंग ही नाही होवू शकले
जो सजवी चित्र महाल..
जाहले फक्त सावली
जी नसे आपुली
अंधारूनी आल्यावर
देई साथ सोडूनी..



..... श्वेता

# ...... ताई ......

तुळशीतला दिवा,
सौम्य प्रकाश..

घरात चाललेली,
आईची लगबग..

उंब-यावरची रांगोळी,
ताई बसलीय गिरवत..

माझ्या हाती मात्र,
ऑल्या मेंदिचा सुवास..

बाबाना काळजी,
त्यांच्या कुरुप हंसाची..

हळद वाट पाहे,
ताईच्या सावळ्या रंगाची..



..... चैताली म्हापसेकर

# ...... कर्ण ......

उरले काही..
सरले काही..

हस-या याचका
तृप्त पाहता..

ओंजळीत तयाच्या
न पुरले काही..



..... प्राजक्त देशमुख

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

------------------------



------------------------

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..


**netaksharee@gmail.com**